**सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित मुंबई, यांना वेतनेतर खर्चासाठी सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- मलवि-२०२४/प्र.क्र.९/उद्योग-६.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १५ मार्च, २०२४.

**वाचा :** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.२६/प्रशा.-१, दि.१७/०४/२०२३.
३) महाव्यवस्थापक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांचे पत्र क्र.मलउविम/ शा.प./ २०२३-२४/७३४ दि.२३/०१/२०२४.

**प्रस्तावना:-**

हस्तव्यवसाय उद्योगांचा विकास व विपणन या लेखाशीर्षाअंतर्गत "मागणी क्रमांक के-७, २८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०४ हस्तव्यवसाय उद्योग (००) (००)(०२) हस्तव्यवसाय उद्योगाचा विकास (कार्यक्रम) (२८५१ ०५६७) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षांतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता अनुदान उपलब्ध करून देण्याबाबतच्या महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाच्या विनंती नुसार महामंडळामार्फत विविध प्रदर्शनाच्या व प्रशिक्षणाच्या आयोजनाकरीता अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाच्या संदर्भाधिन दि.२३/०१/२०२४ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्या.यांना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात आयोजित केलेल्या आणि करावयाच्या प्रदर्शनांसाठी मागणी क्र.के-७ लेखाशिर्ष (२८५१०५६७) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टांसाठी रू.५३,३९,४९९/- (अक्षरी त्रेप्पन्न लक्ष एकोणचाळीस हजार चारशे नव्व्याण्णव रूपये मात्र) एवढा अनुदान वितरीत करण्यास, या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्च करताना वित्त व नियोजन विभागांच्या अनुदान वितरणाच्या अटींचे पालन करावे.

**२**. यावरील खर्च "मागणी क्रमांक के-७, २८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०४ हस्तव्यवसाय उद्योग (००) (००)(०२) हस्तव्यवसाय उद्योगाचा विकास (कार्यक्रम) (२८५१ ०५६७) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या उद्दिष्टाखालील सन २०२३-२४ या अर्थसंकल्पीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**३**. सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर अनुदान खर्च झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र महाराष्ट्र लघूद्योग विकास महामंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे मंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

**४**. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.१०७/का.१४६१, दि.२२.०२.२०२४ अन्वये आणि वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ

क्र.८०/२०२४/व्यय-१६, दि.१२.०३.२०२४ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०३१५१५२०२२०७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAMKANT SURESH SONAWANE

Digitally signed by SHAMKANT SURESH SONAWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=9d538bbb1d8b0fb128f2644b7e46b2a597ff7be8340138855 5b0d4baa1874713, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=0FACA31EEA9D440C573E323F027F4B548138E0057E0DAA48093F263662E5B218, cn=SHAMKANT SURESH SONAWANE
Date: 2024.03.15 15:29:46 +05'30'

**( शामकांत सोनवणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित.**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
३. अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
९. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई. (५ प्रती)
१०. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-३,१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई -३२
११. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (उद्योग-६).